**सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त समाजकल्याण, पुणे व आयुक्त, अपंगकल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सकआ २०१५/ प्र.क्र. ९/ आस्था २**

मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २२ मे, २०१५

**वाचा :**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही २०१४/ व्हीआयपी २८४/ प्र.क्र. ३६२/१२, दि. २६.११.२०१४

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही २०१४/ व्हीआयपी २९३/ प्र.क्र. ३६२/१२, दि. ९.१२.२०१४

**प्रस्तावना :**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ६ मध्ये शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आले आहेत. या अधिनियमातील कलम ६ खालील पंरतुक २ मधील तरतुदीच्या अनुषंगाने प्रशासनातील कालापव्यय टाळून निर्णय प्रक्रियेतील टप्पे कमी होण्याच्या दृष्टीने विभागातील तसेच क्षेत्रिय आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २६.११.२०१४ व दि. ९.१२.२०१४ रोजीच्या परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त,समाजकल्याण, पुणे व आयुक्त, अपंगकल्याण पुणे यांच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकानुसार व कलम ७ नुसार या विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त,समाजकल्याण, पुणे व आयुक्त, अपंगकल्याण, पुणे

यांच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत -

| अ.क्र | गट व पदनाम | वेतनश्रेणी | सक्षम प्राधिकारी | बदली अधिकार प्रत्यार्पित करावयाचे प्राधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक आयुक्त, समाजकल्याण व तत्सम गट-अ संवर्ग | ९३००-३४८०० ग्रेड पे ५००० (असुधारीत ७४५०-११५००) | मा. मंत्री, (सा.न्याय) | प्रधान सचिव / सचिव (सा.न्या.व वि.स.विभाग) |
| २ | समाजकल्याण अधिकारी व तत्सम गट-ब संवर्ग | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (असुधारीत ६५००-१०५००) | मा. मंत्री, (सा.न्याय) | प्रधान सचिव / सचिव (सा.न्या.व वि.स.विभाग) |
| ३ | गृहप्रमुख गट - ब | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (असुधारीत ६५००-१०५००) | मा. मंत्री, (सा.न्याय ) | प्रधान सचिव / सचिव (सा.न्या.व वि.स.विभाग) |
| ४ | निरीक्षक (राजपत्रित) अपंग संस्था गट-ब | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (असुधारीत ६५००-१०५००) | मा. मंत्री, (सा.न्याय ) | प्रधान सचिव / सचिव (सा.न्या.व वि.स.विभाग) |

२. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या अधिपत्याखालील अतिरिक्त आयुक्त, समाजकल्याण, सह आयुक्त,समाजकल्याण व उपायुक्त व तत्सम गट- अ संवर्गातील बदल्यांचे अधिकार पूर्वीप्रमाणेच राहतील.

३. या शासन निर्णयान्वये प्रत्यार्पित केलेल्या अधिकारांव्यतिरिक्त महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील सर्व तरतुदी पुर्वीप्रमाणेच लागू राहतील.

४. वरील प्रमाणे प्रदान केलेल्या बदल्यांच्या अधिकारांचा वापर करीत असताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

५. सदरचे आदेश प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२२१५४९२७५८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.22 15:51:03 +05'30'

**(दि.रा.डिंगळे)**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई ३२
मा.मंत्री (सा.न्याय) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (सा.न्याय) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आयुक्त, समाजकल्याण, पुणे
आयुक्त, अपंगकल्याण, पुणे
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण
सर्व अध्यक्ष, विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या
सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
सहसचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२, मंत्रालय, मुंबई ३२
सर्व सहसचिव / उप सचिव, सा.न्या. व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आस्था-२ संग्रहार्थ